नागपूर येथील ख.क्र. २५७/१ नगर भूमापन क्र. १५१६ मोजा लेन्ड्रा व खसरा क्र.७,८ नगर भूमापन क्र.६०६ मौजा अजनी या जागेवर नवीन शासकीय वसतिगृह टप्पा-२ (संत चोखामेळा १००० मुला-मुलीचे वसतिगृह, नागपूर) या इमारतीचे बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बीसीएच-२०२४/प्र.क्र.८६/ बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १३ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, शा.नि.क्र.बीसीएच-२००५/प्र.क्र.५५४/मावक-४, दि.२८.६.२००७.
२) शासन निर्णय, समाजकल्याण विभाग, शा.नि.क्र.बीसीएच-२०१३/प्र.क्र.३६/बांधकामे, दि.३१.०३.२०१६.
३) शासन शुध्दीपत्रक क्र. बीसीएच-२०१३/प्र.क्र.३६/बांधकामे, दि.०३.२.२०१८
४) शासन निर्णय, समाजकल्याण विभाग, शा.नि.क्र.बीसीएच-२०१३/प्र.क्र.३६/बांधकामे, दि.१९.०९.२०१९.
५) महानगर आयुक्त, नागपूर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांचे पत्र जा. क्र. /का.अ.(प्रकल्प-२)/६४६०, दि.२०.०६.२०२४.
६) उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.२९.०१.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

नागपूर येथील ख.क्र. २५७/१ नगर भूमापन क्र. १५१६ मोजा लेन्ड्रा व खसरा क्र.७,८ नगर भूमापन क्र.६०६ मौजा अजनी या जागेवर नवीन शासकीय वसतिगृह टप्पा-२ (संत चोखामेळा १००० मुला-मुलीचे वसतिगृह, नागपूर) इमारत बांधणेबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.४, दि.२०.०६.२०२४ अन्वये महानगर आयुक्त, नागपूर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांनी शासनास सादर केला आहे. उपरोक्त शासकीय वसतिगृह शासनाच्या संदर्भाधीन क्र.१ दि.२८.६.२००७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुरू करण्यात आले आहे. संदर्भ क्र.०२ अन्वये १००० क्षमतेच्या नवीन मागासवर्गीय मुलांच्या शासकीय वसतिगृहाच्या रु.५८.४२ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर संदर्भ क्र.०३ अन्वये सदर वसतिगृहाकरीता १.० च्या ऐवजी १.५० चटईक्षेत्र निर्देशांकानुसार बांधकामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. संदर्भ क्र.०२ व ०३ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन संदर्भ क्र.०४ येथील दि.१९.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर वसतिगृहाकरीता

रु.७४.८७ कोटी इतक्या रकमेच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे. आता, नागपूर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांनी उपरोक्त ठिकाणी वसतिगृह इमारत बांधकामाबाबतचा २.१६ चटईक्षेत्र निर्देशांकानुसार उर्वरित मजल्यांकरीता टप्पा-२ संबंधी प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तवास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नागपूर येथील ख.क्र. २५७/१ नगर भूमापन क्र. १५१६ मोजा लेन्ड्रा व खसरा क्र.७,८ नगर भूमापन क्र.६०६ मौजा अजनी या जागेवर नवीन शासकीय वसतिगृह टप्पा-२ (संत चोखामेळा १००० मुला-मुलीचे वसतिगृह, नागपूर) इमारत बांधणेबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.५, दि.२०.०६.२०२४ अन्वये, नागपूर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांनी शासनास सादर केला आहे. सदर अंदाजपत्रक सहायक अभियंता, (प्रकल्प-१), नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी तयार केले असून सदर अंदाजपत्रकावर कार्यकारी अभियंता (प्रकल्प-१), नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी साक्षांकित केले आहे. त्यास अनुसरून सदर जागेवर नवीन शासकीय वसतिगृह टप्पा-२ (संत चोखामेळा १००० मुला-मुलीचे वसतिगृह, नागपूर) या इमारत बांधकामाबाबच्या रू.७६.८३ कोटी इतक्या रकमेच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अ)** काम सुरू करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरू करावे.

**ब)** ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करूनच काम हाती घ्यावे.

**क)** प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१. दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**ड)** सदर कामाच्या बांधकामाचा खर्च सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.

**इ)** सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/ प्र.क्र.६०/इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

**ई)** सदर अंदाजपत्रकास अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड यांचे साक्षांकन आवश्यक आहे. तसेच विभागाच्या वतीने प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, लातूर यांचे साक्षांकन आवश्यक आहे.

**उ)** नियोजित जागा विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करून सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

**ऊ)** सदर नकाशे महाराष्ट्र शासनाच्या मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून तपासून घेणे आवश्यक आहे.

**ए)** यापूर्वी प्राप्त प्रशासकीय मान्यतेमध्ये प्रस्तावित कामांचा वाव अंतर्भूत नसल्याने सदर कामाची द्वीरुक्ती टप्पा २ च्या प्रशासकीय मान्यतेमध्ये न होण्याची

खातरजमा महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांनी करावी.

**ऐ)** टप्पा-२ मधील बांधकामाच्या संकल्पचित्राबाबत महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांनी उचित निर्णय घ्यावा.

२. सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई यांनी केलेल्या छाननीनुसार व उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.२९.०१.२०२५ रोजीच्या बैठकीतील निर्देशानुसार Recapitulation Sheet सोबत जोडली आहे.

३. यावर होणारा खर्च मागणी क्र. एन-४, मुख्य लेखाशिर्ष ४२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती आणि इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, २७७-शिक्षण, पंचवार्षिक योजनां अंतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) मागासवर्गीय मुलांमुलींसाठी शासकीय वसतीगृह बांधणे (४२२५ ०४८१), ५३-मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.२९.०१.२०२५ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०२१३१७४१५५४७२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA VIJAYSINH DESHMUKH

Digitally signed by PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=a2dd85b17cd3d5311cdc96ff87ec7bb1ccc64c56294fd60222073f2bd8dec000, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3D331EE44AE91C7D48D9B9DBBF7B7A7264F269283FAC405332FED75CFA968E89, cn=PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
Date: 2025.02.13 17:43:23 +05'30'

**( प्रज्ञा वि. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर.
२) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,नागपूर.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
६) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर.
८) सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर.
१०) निवडनस्ती (बांधकामे)